बिगर राज्य नागरी सेवेतून (Non-SCS) भारतीय प्रशासन सेवेत निवडीने नियुक्तीच्या शिफारशीसाठी पात्रता निकष (Benchmark Criteria)- स्पष्टीकरण

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एआयएस-१०१२/प्र.क्र.६९/२०१२ (भाग१)/दहा,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: २०.१०.२०१५

संदर्भ:-

१) **सा.प्र.वि.,शासन निर्णय क्रमांकः एआयएस-१३१०/प्र.क्र.५६३/२०१०/दहा, दिनांक ०७.०९.२०११**
२) **वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांकः अरजा-२४०२/२५/सेवा-८, दिनांक ०७.१०.२००२.**

**शासन परिपत्रक:-**

बिगर राज्य नागरी सेवेतून (Non-SCS) भारतीय प्रशासन सेवेत निवडीने नियुक्तीच्या शिफारशीसाठी संदर्भाधीन क्र. १ येथे नमूद शासन निर्णय क्र. एआयएस-१३१०/प्र.क्र.५६३/२०१०/दहा, दि. ०७.०९.२०११ अन्वये पात्रता निकष (Benchmark Criteria) विहित करण्यात आले आहेत.

२. वित्त विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन क्र. २ येथे नमूद दि. ०७.१०.२००२ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार राज्य शासनाच्या काही विभागातील अधिकाऱ्यांनी विशेष असाधारण रजा उपभोगली असल्याने/सदर कालावधीत ते कर्तव्यावर नसल्यामुळे त्यांचे सदर कालावधीचे गोपनीय अहवाल उपलब्ध नाहीत. अशा अधिकाऱ्यांकडून वित्त विभागाच्या दि. ०७.१०.२००२ च्या शासन निर्णयातील तरतूद क्र. २० (अ) नुसार विशेष असाधारण रजेपूर्वीचे गोपनीय अभिलेख विचारात घेऊन भाप्रसेमध्ये निवडीने नियुक्तीकरीता विचार व्हावा अशी निवेदने/विनंत्या या विभागास वारंवार प्राप्त होत आहेत/ झाल्या आहेत.

३. यासंबंधी या परिपत्रकान्वये असे स्पष्ट करण्यात येते की, वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र. २ येथे नमूद दि. ०७.१०.२००२ च्या शासन निर्णयातील तरतूद क्र. २० (अ) ही राज्य शासनाअंतर्गतच्या संवर्गातील पदोन्नतीसंदर्भात लागू आहे. बिगर राज्य नागरी सेवेतून (Non-SCS) भारतीय प्रशासन सेवेत निवडीने नियुक्तीकरीता वित्त विभागाच्या विशेष असाधारण रजा

योजनेसंदर्भातील दि. ०७.१०.२००२ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २० (अ) येथील तरतूद लागू होत नाही.

४. हे शासन परिपत्रक वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३२९/२०१५/सेवा-६, दि. १२.१०.२०१५ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२०१०५८२७५३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.10.23 15:58:12 +05'30'

**(डॉ.भगवान सहाय)**
**अपर मुख्य सचिव (सेवा)**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
४. महालेखापाल, महाराष्ट्र शासन,
५. सर्व मंत्रालसयीन अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
६. सचिव, कार्मिक व प्रशिक्षण विभाग, भारत सरकार, नवी दिल्ली,
७. सचिव, संघ लोकसेवा आयोग, नवी दिल्ली,
८. सर्व मंत्र्यांचे खाजगी सचिव,
९. सर्व मंत्रालयीन विभाग,
१०. निवड नस्ती.